"मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत "जिल्हा/
तालुका स्पेसिफिक योजना” अंतर्गत रोजगार
निर्मिती करिता “विशेष योजना" राबविण्याबाबत
मार्गदर्शक सूचना.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र. माविका -२०२२/प्र.क्र.२८/का.१४१८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २३ मे, २०२२

वाचा-

१ नियोजन विभाग शा.नि.क्र. माविमि २०१०/प्र.क्र.८१/का.१४१८, दि.१९ जुलै,२०११.
२ नियोजन विभाग शा.नि.क्र. माविका २०२१/प्र.क्र.३१/का.१४१८, दि. २ डिसेंबर,२०२१.
३ वित्त विभाग शा.नि.क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.४ एप्रिल, २०२२.

प्रस्तावना-

"मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत २३ जिल्ह्यातील १२५ मागास तालुक्यांतील महिला बचतगट आणि अनुसूचित जाती/जमातीचे सक्षमीकरण करण्याकरिता प्रत्येक तालुक्याला रु.२.०० कोटी इतका निधी "रोजगार निर्मिती" वर अधिक भर देण्यासाठी "विशेष योजना" तयार करुन त्या राबविण्याकरीता द्यावयाची बाब विचाराधीन आहे. “मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत प्रत्येक जिल्ह्याला प्राप्त एकूण निधीच्या २० टक्के निधीच्या मर्यादेमुळे जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजनेअंतर्गत २३ जिल्ह्यातील १२५ मागास तालुक्यांना "रोजगार निर्मिती" करिता विशेष योजना राबविण्यासाठी समान प्रमाणात निधी उपलब्ध होत नव्हता. त्यामुळे या प्रत्येक मागास तालुक्यातील नागरिकांना "रोजगार निर्मिती" करिता अधिक संधी समप्रमाणात उपलब्ध करुन देण्याकरिता "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना" आर्थिक वर्ष सन २०२२-२३ करीता राबविण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

## शासन निर्णय-

सन २०२२-२३ करीता “मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत २३ जिल्ह्यातील १२५ मागास तालुक्यातील महिला बचत गट आणि अनुसूचित जाती/जमातीचे सक्षमीकरण करण्याकरिता "रोजगार निर्मिती" वर अधिक भर देण्यासाठी "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना " तयार करुन त्या राबविण्यासंदर्भात " मार्गदर्शक सूचना" खालीलप्रमाणे विहित करण्यात येत आहेत-

(१) “मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत २३ जिल्ह्यातील १२५ तालुक्यांमध्ये तेथील स्थानिक अर्थव्यवस्थेची परिस्थिती विचारात घेऊन "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत “विशेष योजना” तयार करताना त्याची उपयुक्तता व शाश्वतता विचारात घेऊन व

जास्तीत जास्त महिला बचत गट, शेतकरी उत्पादक गट, अनुसूचित जाती/जमातीचे शेतकरी उत्पादक कंपनी, आदिवासीचे वन धन केंद्र, जीवनोन्नती अभियानाचे ग्रामसंघ, आत्मा गट, आदिवासी सहकारी संस्था,मच्छिमार सहकारी संस्था व इतर सहकारी संस्था, आदिवासी पेसा भागातील ग्रामसभा,तसेच उमेद व माविम व्यतिरिक्त इतर संस्थानी स्थापन केलेले महिला बचत गट या वर्गातील लोकांकरिता "रोजगार निर्मिती" करता येईल या उद्दीष्टासह "विशेष योजना" संबंधित जिल्हाधिकारी तथा जिल्हा मानव विकास समिती हे तयार करून आयुक्त, मानव विकास यांना तत्वत: मान्यतेस्तव सादर करतील.

(२) सदर योजना राबविताना प्रति तालुका रु. २.०० कोटीच्या मर्यादेत उपजीविका व रोजगार निर्मिती क्षेत्राशी संबंधित बाबीचे प्रस्ताव जिल्हाधिकारी यांचेमार्फत आयुक्त, मानव विकास यांना सादर करण्यात येतील. "विशेष योजना" करिता तालुकानिहाय प्रस्ताव तयार करुन आयुक्त, मानव विकास, औरंगाबाद यांचेकडे जिल्हाधिकारी यांच्या शिफारशीसह सादर करावा. तद्नंतर "आयुक्त, मानव विकास, औरंगाबाद" यांनी जिल्हाधिकारी यांनी शिफारस केलेला तालुकानिहाय प्रस्ताव "मानव विकास कार्यक्रम" च्या उद्देशांशी सुसंगत आहे व स्थानिक अर्थव्यवस्थेला चालना देणारा आहे, याची शहानिशा करुन त्यास तत्वतः मान्यता द्यावी. संबंधित जिल्हाधिकारी यांना "मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत आर्थिक वर्ष सन २०२२-२३ मध्ये "जिल्हा/ तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना"करिता २३ जिल्ह्यातील १२५ तालुक्यांना रु.२.०० कोटी प्रति तालुका प्रमाणे निधी वितरीत करण्यात येईल. "रोजगार निर्मिती" संबंधित "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना" तयार करताना राज्य शासनाच्या "रोजगार निर्मिती" करणारे इतर कार्यक्रम/योजनामध्ये द्विरुक्ती होऊ नये.

(३) "मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत आर्थिक वर्ष सन २०२२-२३ मध्ये "जिल्हा/ तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत विशेष योजना राबविण्याबाबतचे प्रस्ताव तयार करताना स्थानिक अर्थव्यवस्थेला केंद्रीत करुन महिला बचतगट आणि अनुसूचित जाती/जमातीला प्राधान्य राहील. प्रस्ताव तयार करताना उत्पन्नवाढ करण्यास उपयुक्तता व शाश्वतता याव्यतिरिक्त "सामाजिक व आर्थिकदृष्ट्या मागास प्रवर्ग" जनगणना (S.E.C.C.) मध्ये समावेश असलेल्या गरीब वर्गाचा विचार करता येईल. या वर्गाचे शेतकरी उत्पादक गट व महिला बचत गट यांचेमार्फत "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना" राबविण्यात यावी. यातील एकाच योजना/प्रकल्पाकरिता मोठ्या आर्थिक तरतूदीची योजना प्रस्तावित करु नये. प्रत्येक तालुक्यांमध्ये "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत विशेष योजना वेगवेगळ्या गावांमध्ये व प्रत्येक तालुक्यांकरिता किमान चार स्वतंत्र प्रस्ताव जिल्हाधिकारी यांनी "आयुक्त, मानव विकास, औरंगाबाद" यांचेकडे सादर करावे. तसेच याव्यतिरिक्त स्थानिक गरजेनुसार आरोग्य व शिक्षण विषयक प्रस्ताव घेणे आवश्यक असल्यास जिल्हाधिकारी यांनी सर्वकष विचार करुन तसेही प्रस्ताव सादर करावेत.

(४) मानव विकास कार्यक्रमांतर्गत "Action Room to Reduce Poverty" संदर्भात १३ जिल्ह्यातील निवडक २७ तालुक्यांमध्ये कौशल्य विकास व रोजगारनिर्मिती करण्यास राबविण्यात येणा-या तालुकास्तरावरील विशेष योजनांबाबत, वित्तिय अधिकार नियमपुस्तिका १९७८ व वित्त विभाग शा.नि. क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७/०४/२०१५ मधील भाग १, उप विभाग ३ अ.क्र.४ नियम क्र.२७(२)(अ) अन्वये प्रशासकीय विभागास असलेले "योजनेला किंवा प्रस्तावाला प्रशासकीय (वित्तिय मंजूरी धरुन ) अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु.५.०० कोटीपर्यत मान्यता देण्याचे" वित्तिय अधिकार जिल्हाधिकारी यांना यापूर्वी नियोजन विभाग शा. नि. क्र. माविका-२०१७/ प्र.क्र.२९/ का.१४१८, दि. १४/०२/२०१९ अन्वये प्रदान करण्यात आले आहेत. या धर्तीवर "मानव विकास कार्यक्रम"खाली "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना" राबविण्याकरिता प्रशासकीय मान्यतेचे वित्तीय अधिकार संबंधित जिल्हाधिकारी यांना देण्यात येत आहेत.

(५) “मानव विकास कार्यक्रम” अंतर्गत “Action Room to Reduce Poverty” खाली यापूर्वी हाती घेण्यात आलेल्या "विशेष योजना" व “मानव विकास कार्यक्रम” अंतर्गत नियमितपणे २०% निधीतून हाती घेण्यात आलेल्या "जिल्हा तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत राबविण्यात आलेल्या योजनाची उत्पन्नवाढी करिता उपयुक्तता व शाश्वतता विचारात घेऊन संबंधित जिल्हाधिकारी यांनी "आयुक्त, मानव विकास, औरंगाबाद" यांचेकडे “मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत आर्थिक वर्ष २०२२-२३ मध्ये "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना" बाबत प्रस्ताव विचारार्थ सादर करणे अपेक्षित राहील.

(६) “मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत आर्थिक वर्ष सन २०२२-२३ मध्ये "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना" द्वारे राबविण्यात येणा-या कामाला “तांत्रिक मान्यता” देण्याचे अधिकार संबंधित कार्यान्वयीन यंत्रणेच्या विभागीय व जिल्हास्तरीय अधिकारी यांना प्रशासकीय विभागाने प्रदान केलेल्या वित्तीय मर्यादेप्रमाणे राहील.

(७) “मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत आर्थिक वर्ष सन २०२२-२३ मध्ये "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना" तयार करतांना महिला बचत गट,लोक संचलित साधन केंद्र, शेतकरी गट, शेतकरी उत्पादक कंपनी, अनुसूचित जाती/जमातीचे शेतकरी उत्पादक कंपनी, आदिवासीचे वन धन केंद्र, जीवनोन्नती अभियानाचे ग्रामसंघ, आत्मा गट यांच्या माध्यमातून घेणे आवश्यक राहील. तसेच मानव विकास कार्यक्रम अंतर्गत समाविष्ट असलेल्या तालुक्यातील आदिवासी सहकारी संस्था,मच्छिमार सहकारी संस्था व इतर सहकारी संस्था, आदिवासी पेसा भागातील

ग्रामसभा,तसेच उमेद व माविम व्यतिरिक्त इतर संस्थानी स्थापन केलेले महिला बचत गट हे देखील या योजनेसाठी लाभार्थी म्हणून अर्ज करु शकतील.

(८) “मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत २३ जिल्ह्यातील १२५ तालुक्यांमध्ये तेथील स्थानिक अर्थव्यवस्थेची परिस्थिती विचारात घेऊन "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत “विशेष योजना" यासाठी सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थी समुहासाठी ७५:२५ तसेच अनुसूचित जाती/अनुसूचित जमाती प्रवर्गातील लाभार्थी समुहासाठी ९०:१० याप्रमाणे अनुदान व लाभार्थी सहभाग प्रत्येक "विशेष योजना" करिता राहिल.

(९) “मानव विकास कार्यक्रम” अंतर्गत महिला बचतगट आणि अनुसूचित जाती/ जमातीचे सक्षमीकरण करण्याकरिता रोजगार निर्मिती संबंधित “विशेष योजना” प्रस्ताव तयार करताना “शाश्वत विकास ध्येये (Sustainable Development Goals)” अंतर्गत असलेली विशेषतः गरिबी निर्मूलन, उपासमारीचे समूळ उच्चाटन सारखी ध्येय साध्य करण्यास उपयुक्त ठरेल याचाही जिल्हाधिकारी यांनी विचार स्थानिक लाभार्थी समुह निवडताना करणे अपेक्षित राहील.

(१०) “मानव विकास कार्यक्रम” अंतर्गत जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना "अंतर्गत "विशेष योजना" राबविण्यासाठी प्राधान्याने "आयुक्त, मानव विकास, औरंगाबाद" यांचेकडे शिफारस करणे, "तत्वतः मान्यता" (In Principal Approval) मिळाल्यानंतर "जिल्हाधिकारी" कडून "प्रशासकिय मान्यता" (Administrative Approval) देऊन कार्यान्वयीन यंत्रणेला निधीचे वितरण, प्रगतीचा व खर्चाचा आढावा घेणे इत्यादी बाबत संगणक प्रणाली वापरुन अद्ययावत माहिती उपलब्ध होण्याकरिता "आयुक्त, मानव विकास, औरंगाबाद" यांनी प्राधान्याने पोर्टल विकसित करावे. या पोर्टलवर कार्यवाही झाल्यावर “मानव विकास कार्यक्रम” अंतर्गत " जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना" बाबत अदयावत माहिती सादर करण्याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित जिल्हा नियोजन अधिकारी/सहायक जिल्हा नियोजन अधिकारी यांची राहील.

(११) “मानव विकास कार्यक्रम” अंतर्गत राबविण्यात येणा-या तालुका स्तरावरील योजनेकरीता दिला जाणारा निधी हा “मागणी क्रमांक ओ-१, २०५३, जिल्हा प्रशासन, ०९३ जिल्हा आस्थापना, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०४) (०१) मानव विकास निर्देशांक वृध्दी करणे (२०५३१२३१) दत्तमत" या लेखाशीर्षातंर्गत, उद्दिष्ट "३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)” खाली सन २०२२-२३ करीता उपलब्ध अनुदानातून संबंधित जिल्ह्यांचे जिल्हाधिकारी यांना वितरीत करण्यात येईल.

नियोजन विभागाचा सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/ प्र.क्र.४३/ अर्थ-३, दि.४/०४/२०२२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. ४/०४/२०२२ च्या परिपत्रकान्वये सूचित केल्यानुसार वित्त विभागाकडून प्राप्ततेनुसार निधी वितरण करण्यात येईल.

नियोजन विभागाचा हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२२०५२३१५५५२७५७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SANJEEV
HARISHCHANDRA
DHURI

Digitally signed by SANJEEV HARISHCHANDRA DHURI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b2040f8afae5b15468c26cd79b1393381092c74fb3501bf565f466dec2136a36, pseudonym=457F70F5FA4DEA10E909A007981CEAF0F1C5A45D, serialNumber=F955EDB9F98089D5B84355354FDE7CA14F577C3C2B384D076E4614388B1F5E7A, cn=SANJEEV HARISHCHANDRA DHURI
Date: 2022.05.23 15:58:21 +05'30'

**(सं. ह. धुरी)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
२. आयुक्त, मानव विकास,मानव विकास आयुक्तालय ,औरंगाबाद
३. विभागीय आयुक्त, कोकण/नाशिक/ अमरावती/ औरंगाबाद / नागपूर
४. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष मानव विकास समिती,पालघर, ठाणे, रायगड, सिंधुदुर्ग, नाशिक, धुळे, जळगाव, नंदुरबार, जालना, परभणी, हिंगोली, बीड, नांदेड, बुलढाणा, अकोला, वाशिम, अमरावती, यवतमाळ, नागपुर, भंडारा, गोंदिया, चंद्रपुर,गडचिरोली.
५. जिल्हा नियोजन अधिकारी/ सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, पालघर, ठाणे, रायगड, सिंधुदुर्ग,नाशिक, धुळे, जळगाव, नंदुरबार, जालना, परभणी, हिंगोली, बीड, नांदेड, बुलढाणा, अकोला, वाशिम, अमरावती, यवतमाळ, नागपुर, भंडारा, गोंदिया, चंद्रपुर, गडचिरोली.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय (सर्व संबंधित)
७. वित्त विभाग (कार्यासन-अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
९. कार्यासन अधिकारी (का .१४२४), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती.